आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ आर्थिक वर्षातील योजनांचे मुल्यमापन, सनियंत्रण व उपयोगीता तपासणे, (कार्यक्रम खर्च) या अंतर्गत निधी वितरण. (लेखाशीर्ष २२२५ एफ २८१)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-२५ जानेवारी, २०२२.

**वाचा -**

१) शासन निर्णय, वि. वि. , क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. आविवि-२००८/प्र.क्र.१०३/का-९,दि.१७.१०.२००८.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. राज्यपा२०१५/प्र.क्र.३६/का-१६,दि.३१.०३.२०१५.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. राज्यपा२०१५/प्र.क्र.५४/का-१६,दि.३.०६.२०१५.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. राज्यपा२०१५/प्र.क्र.८६/का-१६,दि.३.०३.२०१६.
६) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयाचे पत्र क्र. आसंप्रसं-२०२१/ वहका-१२/का.४/५१४, दि.३०.१२.२०२१.
७) आदिवासी विकास विभागाची नस्ती, क्र.संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.२१२/ का-१४.

**प्रस्तावना:-**

" अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६" व नियम २०१२ च्या अंमलबजावणीबाबत वनहक्क कायदा अंमलबजावणीकरीता संदर्भाधीन क्र.२ ते ५ येथील शासन निर्णयान्वये जिल्हास्तरीय व उपविभागीय वन हक्क समितीच्या अधिनस्त कंत्राटी तत्वावर समन्वयक, सहाय्यक व व्यवस्थापक नेमणूक करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. याप्रमाणे जिल्हास्तर व उपविभाग स्तरावर कार्यरत असलेल्या एकूण ११७ कंत्राटी तत्वावरील समन्वयक, सहाय्यक व व्यवस्थापक यांच्या मानधनासाठी तसेच वनहक्क समित्यांच्या कार्यालयीन व इतर तत्सम बाबींसाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून संदर्भाधीन क्र.६ अन्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य शीर्षाखालील आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मुल्यमापन, संनियंत्रण व उपयोगिता तपासणे या योजनेच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून खालीलप्रमाणे ५० टक्के मर्यादेतील उपलब्ध निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| अ. क्र. | योजना व लेखाशीर्ष | बाब | सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पित तरतूद | वितरणासाठी उपलब्ध | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मुल्यमापन, संनियंत्रण व उपयोगिता तपासणे (२२२५ एफ २८१) | १०-कंत्राटी सेवा | २००.०० | १००.०० | १००.०० |
| | | १३-कार्यालयीन खर्च | १००.०० | ५०.०० | ५०.०० |
| | **एकूण** | | **३००.००** | **१५०.००** | **१५०.००** |

२. वरीलप्रमाणे **रू. १५०.०० लाख (अक्षरी रूपये एक कोटी पन्नास लाख फक्त )** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणुन आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित करावी. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयांन्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२४१२५७१७०७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.01.27 12:09:27 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती .
६. जिल्हाधिकारी,ठाणे/ यवतमाळ/ गडचिरोली/ नाशिक/ नांदेड/कोल्हापूर/ चंद्रपुर/ पालघर/ रायगड/ जळगाव/ धुळे/ नंदुरबार.
७. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर/ पांढरकवडा/ पुसद/ अहेरी/ भामरागड/ गडचिरोली/ कळवण/ नाशिक/ पेण/ किनवट/ तळोदा/ नंदुरबार/चंद्रपुर/ डहाणू/ जव्हार.
८. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. उपसचिव/कक्ष अधिकारी (का-१४ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती (का-६).